पोलीस आयुक्त,नागपूर शहर यांच्या आस्थापनेवरील पोलीस स्टेशन पारडी,वाठोडा व कपिलनगर करिता नव्याने निर्माण केलेल्या ३३५ अस्थायी पदांना मुदतवाढ देण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : सीटीई-२६१८/प्र.क्र. ८५ /पोल-३**
मंत्रालय, दुसरा मजला, मुख्य इमारत,
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : १५ ऑक्टोबर, २०१९.

**वाचा:-**

१) शासन निर्णय,गृह विभाग क्र.पीओएस-२६१६/प्र.क्र.१३८/पोल-३, दि.२१.०४.२०१८
२) शासन निर्णय,गृह विभाग क्र.पीओएस-२६१६/प्र.क्र.१३९/पोल-३, दि.२१.०४.२०१८
३) शासन निर्णय,गृह विभाग क्र.पीओएस-२६१६/प्र.क्र.११९/पोल-३, दि.२१.०४.२०१८
४) शासन निर्णय,गृह विभाग क्र.सीटीई-२६१८/प्र.क्र.८५/पोल-३,दि.१८.०३.२०१९
५) अपर पोलीस महासंचासलक (नि. व स.) यांचे पत्र क्र.पोमसं/२६-ब/ मुदतवाढ/ पारडी, वाठोडा, कपिलनगर/३६/२०१८, दि.०३.०७.२०१९.
६) वित्त विभाग क्र.पदनि-२०१६/प्र.क्र.०८/१६/आ.पु.क., दि.११.०९.२०१९.

**शासन निर्णय:-**

उपरोक्त संदर्भ क्र.१ येथील शासन निर्णय, गृह विभाग क्र.पीओएस-२६१६/प्र.क्र.१३८/पोल-३,दि.२१.०४.२०१८अन्वये कळमना पोलीस ठाण्याचे विभाजन करून पारडी पोलीस ठाणे निर्माण करण्यात आले आहे, उपरोक्त संदर्भ क्र.२ येथील शासन निर्णय, गृह विभाग क्र.पीओएस-२६१६/प्र.क्र.१३९/पोल-३,दि.२१.०४.२०१८अन्वये पोलीस आयुक्त,नागपूर शहर यांच्या आस्थापनेवरील नंदनवन पोलीस ठाण्याचे विभाजन करून वाठोडा पोलीस ठाणे व उपरोक्त संदर्भ क्र.३ येथील शासन निर्णय, गृह विभाग क्र.पीओएस-२६१७/प्र.क्र.११९/पोल-३,दि.२१.०४.२०१८अन्वये जरीपटका पोलीस ठाण्याचे विभाजन करून कपीलनगर पोलीस ठाणे व पोलीस आयुक्त,नागपूर शहर यांच्या आस्थापनेवर नवनिर्मित पोलीस ठाणे,वाठोडाकरिता ६० पदे,कपीलनगरकरिता ११७ पदे व पारडी करिता १५८ पदे अशी एकूण तीन पोलीस ठाण्याकरिता विविध संवर्गातील एकूण ३३५ पदे निर्माण करण्यात आली आहेत.

उपरोक्त संदर्भ क्र.४ येथील दि.१८.०३.२०१९ रोजीच्या शासन निर्णयान्वये सदर पदांना दि.०१.०३.२०१९ ते दि.३०.०९.२०१९ या कालावधीकरिता मुदतवाढ देण्यात आली आहे. उपरोक्त संदर्भ क्र.५ येथील दि.०३.०७.२०१९ रोजीच्या पत्रान्वये अपर पोलीस महासंचासलक (नि. व स.) यांनी सदर पदांना दि.०१.१०.२०१९ पासून पुढील कालावधीसाठी मुदतवाढ देण्याची विनंती केली आहे.

उपरोक्त ३ नवनिर्मित पोलीस ठाण्याकरिता निर्माण करण्यात आलेल्या पदांचा तपशील

| अ.क्र | पदनाम | वाठोडा पोलीस ठाणे | कपीलनगर पोलीस ठाणे | पारडी पोलीस ठाणे |
|---|---|---|---|---|
| १ | पोलीस निरीक्षक | ०२ | ०२ | ०२ |
| २ | पोलीस उप निरीक्षक | १२ | १५ | १० |
| ३ | सहा.पोलीस उप निरीक्षक | ०५ | ०५ | १० |
| ४ | पोलीस हवालदार | १५ | २० | ४५ |
| ५ | पोलीस शिपाई | २० | ६५ | ८५ |
| ६ | चालक पोलीस शिपाई | ०६ | ०८ | ०६ |
| ७ | सफाईगार | ०० | ०२ | ०० |
| एकूण | | ६० | ११७ | १५८ |
| पदसंख्या (६०+११७+१५८=३३५) | | | | |

उपरोक्त ३ पोलीस स्टेशनचा पदनिहाय तपशील खालीलप्रमाणे आहे.

१) पोलीस आयुक्त,नागपूर शहर यांच्या आस्थापनेवरील पारडी पोलीस ठाणे करिता नवनिर्मित पदे

| अ. | पदनाम | पद संख्या | पदे निर्माण केल्याचा शासन निर्णय व दिनांक | शेवटची मुदतवाढ दिलेला शासन निर्णय व दिनांक |
|---|---|---|---|---|
| १ | पोलीस निरीक्षक | ०२ | शासन निर्णय क्र. पीओएस-२६१६/ प्र.क्र.१३८/पोल-३, दि.२१.०४.२०१८ | शासन निर्णय क्र.सीटीई-२६१८/प्र.क्र.८५/पोल-३, दि.१८.०३.२०१९ |
| २ | पोलीस उप निरीक्षक | १० | | |
| ३ | सहायक पोलीस उप निरीक्षक | १० | | |
| ४ | पोलीस हवालदार | ४५ | | |
| ५ | पोलीस शिपाई | ८५ | | |
| ६ | चालक पोलीस शिपाई | ०६ | | |
| एकूण | | १५८ | | |

२) पोलीस आयुक्त,नागपूर शहर यांच्या आस्थापनेवरील वाठोडा पोलीस ठाणे करिता नवनिर्मित पदे

| अ. | पदनाम | पद संख्या | पदे निर्माण केल्याचा शासन निर्णय व दिनांक | शेवटची मुदतवाढ दिलेला शासन निर्णय व दिनांक |
|---|---|---|---|---|
| १ | पोलीस निरीक्षक | ०२ | शासन निर्णय क्र. पीओएस-२६१६/ प्र.क्र.१३९/पोल-३, दि.२१.०४.२०१८ | शासन निर्णय क्र.सीटीई-२६१८/ प्र.क्र.८५/ पोल-३,दि.१८.०३.२०१९ |
| २ | पोलीस उप निरीक्षक | १२ | | |
| ३ | सहायक पोलीस उप निरीक्षक | ०५ | | |
| ४ | पोलीस हवालदार | १५ | | |
| ५ | पोलीस शिपाई | २० | | |
| ६ | चालक पोलीस शिपाई | ०६ | | |
| | एकूण | ६० | | |

३) पोलीस आयुक्त,नागपूर शहर यांच्या आस्थापनेवरील कपिलनगर पोलीस ठाणे करिता नवनिर्मित पदे

| अ. | पदनाम | पद संख्या | पदे निर्माण केल्याचा शासन निर्णय व दिनांक | शेवटची मुदतवाढ दिलेला शासन निर्णय व दिनांक |
|---|---|---|---|---|
| १ | पोलीस निरीक्षक | ०२ | शासन निर्णय क्र. पीओएस-२६१६/ प्र.क्र.११९/पोल-३, दि.२१.०४.२०१८ | शासन निर्णय क्र. सीटीई-२६१८/ प्र.क्र.८५/पोल-३, दि.१८.०३.२०१९ |
| २ | पोलीस उप निरीक्षक | १५ | | |
| ३ | सहायक पोलीस उप निरीक्षक | ०५ | | |
| ४ | पोलीस हवालदार | २० | | |
| ५ | पोलीस शिपाई | ६५ | | |
| ६ | चालक पोलीस शिपाई | ०८ | | |
| ७ | सफाईगार | ०२ | | |
| | एकूण | ११७ | | |

२. आता पोलीस आयुक्त,नागपूर शहर यांच्या आस्थापनेवरील उपरोक्त तक्त्यात नमूद केलेल्या पोलीस स्टेशन पारडी,वाठोडा व कपिलनगर करिता नव्याने निर्माण केलेल्या ३३५ अस्थायी पदांना दिनांक ०१ ऑक्टोबर,२०१९ ते दिनांक २९ फेब्रुवारी, २०२० पर्यंत खालील अटींच्या अधीन राहून मुदतवाढ देण्यास शासन मंजूरी देण्यात येत आहे.

१) सहा महिन्यापेक्षा जास्त काळ रिक्त पदे वगळून उर्वरित पदांना मुदतवाढ देण्यात यावी. तसेच पदे ज्या कारणास्तव ज्या अटी व शर्तीच्या अधीन राहून मंजूर केली आहेत, त्याचे पालन करण्यात यावे.

२) शासन निर्णय, वित्त विभाग क्र.असंक-१००१/प्र.क्र.२९/२००१/वित्तिय सुधारणा-१, दिनांक १० सप्टेंबर २००१ आणि क्र.असंक-१००४/प्र.क्र.१२/२००४/वित्तिय सुधारणा-१, दिनांक १९ ऑगस्ट २००४ नुसार पदांच्या आढाव्याची कार्यवाही तातडीने पूर्ण करुन कार्यालयाचा सुधारित आकृतीबंध उच्चस्तरीय सचिव समितीकडून अंतिमत: मान्य करुन घेण्याबाबतचा प्रस्ताव तात्काळ शासनास सादर करण्यात यावा.

३) आस्थापनेवरील मंजूर पदांचा आढावा घेताना शासनाच्या कार्यपद्धतीतील तंत्रज्ञानाचा वाढता वापर, काळानुरुप शासनाच्या मनुष्यबळात बदल व मनुष्यबळाचा परिणामकारक वापराची आवश्यकता या बाबींचा विचार करुन अनावश्यक पदे कमी करण्याचाही विचार करावा.

४) सदर कालावधीमध्ये कोणत्याही परिस्थितीत पदांचा आढावा उच्चस्तरीय समितीसमोर ठेवून मान्यता घेण्याबाबत वित्त विभागाने संदर्भाधिन क्र.६ येथील दिनांक ११.०९.२०१९ च्या शासन निर्णयानुसार सूचित केलेले आहे. ही बाब विचारात घेता दिनांक २९.०२.२०२० अखेर पर्यंत पदांच्या आढाव्याची कार्यवाही पूर्ण न झाल्यास, उपरोक्त अस्थायी पदांना त्या पुढील कालावधीसाठी मुदतवाढ न मिळाल्यास व त्यामुळे अधिकारी/ कर्मचारी यांच्या वेतन व भत्याचा प्रश्न निर्माण झाल्यास याबाबतची सर्वस्वी जबाबदारी संबंधित कार्यालयाची राहिल.

३. सदरचा खर्च मागणी क्रमांक बी-१, २०५५-पोलीस, (००) ००१ संचालन व प्रशासन, (००)(०१) पोलीस निरीक्षणालय (२०५५००१४) यालेखाशीर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा व तो सन २०१९-२० या वित्तीय वर्षाच्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

४. हा शासन निर्णय, वित्त विभाग क्रमांक-पदनि २०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क., दिनांक ११.०९.२०१९ अन्वये प्रदान करण्यात आलेल्या अधिकाराचा वापर करुन निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१९१०१६१११२२०५५२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Dinesh Appaji Saste

Digitally signed by Dinesh Appaji Saste
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Home Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=a49495d0d4b31e36ff1d612a85453ca984b74e28fd6f99cdf66e3e499969e942, cn=Dinesh Appaji Saste
Date: 2019.10.16 11:19:12 +05'30'

**( दिनेश सस्ते )**
कार्यासन अधिकारी, गृह विभाग

**प्रत,**

१) पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
२) पोलीस आयुक्त,नागपूर.
३) महालेखापाल ( लेखा व अनुज्ञेयता / लेखा परीक्षा), महाराष्ट्र-१, मुंबई .
४) महालेखापाल ( लेखा व अनुज्ञेयता / लेखा परीक्षा), महाराष्ट्र-२, नागपूर.
५) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
६) निवासी लेखा अधिकारी, मुंबई.
७) वित्त विभाग (व्यय-७) / वित्तिय सुधारणा-१.
८) निवड नस्ती.